**अॅड.श्री.उमेशचंद्र यादव-पाटील, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**जामखेड पोलीस स्टेशन येथील गु.र.नं. ७१/२०१४ (मा.जिल्हा व सत्र न्यायालय, अहमदनगर येथील प्र.क्र.२२५/२०१४) या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या मा.मुंबई उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथील क्रिमि.अॅप्लीकेशन क्र.७२२६/२०१७.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०११८/प्र.क्र.२१/पोल-१०**
गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ सप्टेंबर,२०१८

**संदर्भ:- शासन पत्र, विधि व न्याय विभाग क्र.१०/३०२/क्रिमि.जन./१८/अे-ब्रँच, दिनांक २२ जानेवारी, २०१८.**

**शासन निर्णय:-**

जामखेड पोलीस स्टेशन येथील गु.र.नं.७१/२०१४ (मा.जिल्हा व सत्र न्यायालय, अहमदनगर येथील प्र.क्र.२२५/२०१४) या गुन्ह्यामधुन उद्भवणा-या मा.मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथील क्रिमि.अॅप्लीकेशन क्र.७२२६/२०१७ मध्ये शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी विधि व न्याय विभागाने वरील संदर्भाधीन दि.२२/०१/२०१८ च्या पत्रान्वये अॅड.श्री.उमेशचंद्र यादव-पाटील यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती केली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी अॅड.श्री.उमेशचंद्र यादव-पाटील, विशेष सरकारी अभियोक्ता यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास शासन मान्यता देत आहे.

अ) मा.उच्च न्यायालयातील प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.१०,०००/- (रुपये दहा हजार फक्त)

ब) शासकीय नियमानुसार विमानप्रवास, निवास व वाहन खर्च.

२. प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उमेशचंद्र यादव-पाटील, विशेष सरकारी अभियोक्ता यांना अपरिणामकारक सुनावणी फी अथवा इतर कोणतीही फी वा भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय,वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/ विनियम, दि.२९ जुलै,२०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मध्ये नव्याने समावेश केलेल्या अ.क्र.४९ नियम क्र.१६६-"अ" नुसार प्रशासनिक विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार विधि व न्याय विभागाची मान्यता घेवून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८०९१५१७०२४४०८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.09.15 17:07:58 +05'30'

**( किशोर शामराव भालेराव )**

उप सचिव (विधि), गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.

२. पोलीस अधीक्षक, अहमदनगर-४१४००१.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२,महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी,अहमदनगर.
७. विधि व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. ॲड.श्री.उमेशचंद्र यादव-पाटील,विशेष सरकारी अभियोक्ता (पोलीस अधीक्षक, अहमदनगर यांचे मार्फत)
१०. निवडनस्ती (पोल-१०).